**वैयक्तिक वापराच्या सर्व वस्तूंसाठी थेट निधी देण्यासाठी (Pilots) निवडलेल्या शासकीय आश्रमशाळां व्यतिरिक्त अन्य आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना वैयक्तिक वापराच्या ठराविक वस्तूंसाठी थेट निधी देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः शाआशा- २०१७/ प्र.क्र. ४६२ /का-१३,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई:- ४०० ३२.
दिनांक :- २ मे, २०१७

**वाचा :-**

१) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग, क्रमांकः शाआशा- २०१५/ प्र.क्र. ३४१ /का-१३, दि.१०.३.२०१६

२) शासन निर्णय, उद्योग,उर्जा व कामगार विभाग,क्र.भांखसं२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४ दि.१.१२.२०१६

३) शासन निर्णय, नियोजन विभाग,क्र.डिसीटी२३१६/प्र.क्र.१३३/का १४१७, दि.५.१२.२०१६.

४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांकः शाआशा-२०१७/प्र.क्र.३४१(भाग१) /का१३ दि.२९ एप्रिल, २०१७.

**शासन निर्णय :-**

राज्यातील आदिवासी विकास विभागाच्या शासकीय आश्रमशाळांना अन्नधान्य, कडधान्य, इतर किराणा माल तसेच विद्यार्थ्यांना शैक्षणिक साहीत्य व इतर वस्तुंचा पुरवठा करण्यासंदर्भात दि.१०.३.२०१६ च्या शासन निर्णयान्वये कार्यपध्दती विहीत करण्यात आली आहे. नियोजन विभागाच्या दि.०५.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये शासनाच्या विविध विभागांनी त्यामध्ये नमुद केलेल्या वस्तुंऐवजी लाभार्थ्यांच्या खात्यावर थेट निधी देण्याबाबत सुचना निर्गमित केलेल्या आहेत. प्रायोगिक तत्वावर राज्यातील काही शासकीय आश्रमशाळांमध्ये विद्यार्थ्यांना वैयक्तिक वापराच्या सर्व वस्तूंसाठीची रक्कम विद्यार्थ्यांच्या थेट बँक खात्यात जमा करण्याचा निर्णय शासनाने दि.२९ एप्रिल, २०१७ च्या शासन निर्णयान्वये घेतलेला आहे. सदर शासन निर्णयात नमूद शाळांव्यतिरिक्त अन्य सर्व आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांना वैयक्तिक वापराच्या ठराविक वस्तूंसाठी थेट निधी देण्याबाबत खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

(१) दि.२९ एप्रिल, २०१७ च्या शासन निर्णयातील आश्रमशाळा वगळता अन्य आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांना (१) छत्री, (२) नाईट ड्रेस (३) वुलन स्वेटर (४) सॅन्डल (५) व्हाईट कॅनव्हास शुज (६) व्हाईट सॉक्स (दोन जोड) (७) आंघोळीचा साबण (८) कपडे धुण्याचा साबण (९) खोबरेल तेल (१०) टुथपेस्ट (११) टुथ ब्रश (१२) कंगवा (१३) नेल कटर (१४) मुलींसाठी निळया रीबन (दोन जोड) (१५) टॉवेल (१६) अंडर गारमेंट (१७) स्लिपर या वस्तूंसाठीचा विवरणपत्रात दर्शविलेला निधी विद्यार्थ्यांच्या/पालकांच्या विद्यमान असलेल्या बँक खात्यात जमा करण्यात यावा.

(२) उपरोक्त वस्तू खरेदीसाठी विवरणपत्रात नमुद रक्कमेच्या ६०% रक्कम जुनच्या पहिल्या आठवडयात जमा करण्यात यावी. आश्रमशाळा सुरू झाल्यावर विद्यार्थ्यांनी वरील सर्व वस्तू खरेदी केल्याची खात्री केल्यानंतर उर्वरीत ४०% रक्कम देण्यात यावी.

(३) विवरणपत्रातील संख्येनुसार वस्तुंची खरेदी विद्यार्थी/पालकांनी करणेसाठी मोठया प्रमाणात विद्यार्थी, पालक, शाळा व्यवस्थापन समिती, ग्रामपंचायती, लोकप्रतिनिधी यांचेमध्ये जनजागृती करुन योजनेची प्रसिध्दी करावी.

(४) धारणी, नंदुरबार, तळोदा, जव्हार, भामरागड,अहेरी व गडचिरोली प्रकल्प क्षेत्रातील दुर्गम भागात असलेली बँक सेवांची उपलब्धता लक्षात घेवून संबंधीत प्रकल्प अधिकारी यांनी वरील वस्तूंसाठी थेट निधी देणे किंवा त्यांचे स्तरावरून वस्तू खरेदी करून देणे याबाबत निर्णय घ्यावा व तसे शासनास दि.१० मे, २०१७ पर्यंत कळवावे.

२. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०५०४१७२१४७९९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2017.05.04 17:24:20 +05'30'

(सु. ना. शिंदे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.
३. मा.मंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई :- ४०० ३२.
४. सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.
६. सर्व मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. सर्व मा. विधानसभा सदस्य.
८. सर्व मा. विधानपरिषद सदस्य.
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. मा. सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. मा. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१३. मा. निबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, / खंडपीठ नागपूर / खंडपीठ औरंगाबाद.
१४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१५. सर्व जिल्हाधिकारी.
१६. सरकारी अभियोक्ता, उच्च न्यायालय, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक
१८. अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर / नाशिक/ ठाणे / अमरावती.

१९. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२०. शिक्षण संचालक, (उच्च शिक्षण ) महाराष्ट्र राज्य, पुणे.

२१. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

२२. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई

२३. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.

२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

२५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२६. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

२७. सर्व उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.

२८. उप सचिव ( व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२९. निवडनस्ती (का-१३) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.

-------------

# विवरणपत्र

| वस्तुचे नाव | वर्षासाठी खरेदी करावयाचे नग |
|---|---|
| (१) आंघोळीचा साबण (किमान १०० ग्रॅम) (उदा.लक्स,संतूर,हमाम,रेक्सोना इ.) | १० |
| (२) कपडे धुण्याचा साबण(किमान १०० ग्रॅम) (उदा.व्हील,रीन,घडी,सर्फ इ.) | ३० |
| (३) खोबरेल तेल ( किमान २०० मिली) (उदा. पॅराशुट, कोकोकेअर,निहार इ.) | १० |
| (४) टुथपेस्ट (किमान १०० ग्रॅम) (उदा.क्लोजअप,कोलगेट,पेप्सोडंट,डाबर इ.) | १० |
| (५) टूथब्रश (उदा. कोलगेट,सिबाका,अँकर,पेप्सोडंट इ.) | ४ |
| (६) कंगवा | २ |
| (७) नेल कटर | २ |
| (८) मुलींसाठी निळया रीबन (जोड) | ४ |
| (९)नाईट ड्रेस (टी शर्ट व फुल पँट) | १ |
| (१०) अंडर गारमेंट | २ |
| (११) वूलन स्वेटर | १ |
| (१२) टॉवेल | १ |
| (१३) सँडल | १ |
| (१४) पांढरे कॅनव्हास शूज | १ |
| (१५) पांढरे पायमोजे (दोन) | २ |
| (१६) छत्री | १ |
| (१७) स्लिपर | १ |
| सर्व वस्तूंसाठीची एकत्रित रक्कम रूपये | ४४०० |